**भूसंपादनाची रक्कम प्राधान्याने अदा करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन परिपत्रक क्र. भूसंपा-२००९/(३२७/२००८)/मोप्र-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०४/११/२००९

संदर्भः- मा. लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. उलोआ/कॉम/६२००/२००४ (टे-१२), दि. १० जून २००९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाचे जलसंपदा विभागाकडून त्यांचे अखत्यारीतील कामासाठी लागणाऱ्या जमिनींचे संपादन भूसंपादन अधिनियम १८९४ च्या तरतूदीनुसार अथवा खाजगी वाटाघाटीने केले जाते. विहित प्रयोजनासाठी जमिनी संपादीत करण्यामध्ये उत्तरोत्तर वाढ झालेली आहे. सार्वजनिक प्रयोजनासाठी जमिनी संपादीत करणे अपरिहार्य असले तरी सार्वजनिक प्रयोजनाच्या वाढीबरोबरच ज्यांच्या जमिनीचे संपादन करण्यात येते अशा व्यक्तींना भूसंपादनाची रक्कम निवाडा जाहिर झाल्यानंतर तात्काळ अदा करणे आवश्यक ठरते. यानुषंगाने मा. लोकआयुक्त, महाराष्ट राज्य यांनी महाराष्ट्र लोकआयुक्त आणि उप लोकआयुक्त अधिनियम १९७१ चे कलम १२ (१) अन्वये, संदर्भिय पत्राद्वारे केलेल्या शिफारसी नुसार या संदर्भात शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**परिपत्रक :-**

भूसंपादन निवाडा जाहीर झाल्यावर भूसंपादनाची मोबदल्याची रक्कम जमिन मालकांना देणे शासनाची आद्य स्वरुपाची जबाबदारी असल्यामुळे ती रक्कम प्राधान्याने अदा करावी व अशी रक्कम कोणत्याही इतर कारणांमूळे प्रलंबित ठेवण्यात येवू नये. एकंदरीत निधी कमी पडल्यास धरण अथवा प्रकल्प बांधण्यापेक्षा भूसंपादनाची रक्क्म प्राधान्याने अदा करावी.

सदर परिपत्रक महसूल व वन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९११०४१६५०२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(मु.कि.वैरागडे)
शासनाचे उप सचिव

C:\DOCUME~1\CHAVAN~1\Desktop\327[1].2009.doc

प्रत,

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मा. उप लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. विधानसभा अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानभवन, मुंबई यांचे खाजगी सचिव
अतिरीक्त मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
स्वीय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व तांत्रिक व अतांत्रिक अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक व अतांत्रिक कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मोप्र-२ कार्यासन संग्रहार्थ